**निफाड, ता.निफाड जि.नाशिक येथील ५० खाटांचे उपजिल्हा रुग्णालय १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्थापना २०२१/ प्र.क्र.१०/आरोग्य-३**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य रुग्णालय मार्ग, मुंबई-४०० ००१.
तारीख: ०६ एप्रिल, २०२२.

वाचा: **आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/राज्यस्तर/टे-२/कक्ष-३/ उपजिरु निफाड, ता.निफाड, जि.नाशिक/ना.मं./जा.क्र.३५७६०-६१/१७ , दिनांक.२४.११.२०१७.**

**प्रस्तावना -**

५० खाटांचे उपजिल्हा रुग्णालय, निफाड १०० खाटांमध्ये श्रेणीवर्धन करण्याकरीता लोकप्रतिनिधीकडून वारंवार मागणी करण्यात येत आहे. त्यामुळे आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी उपरोक्त दि.२४.११.२०१७ च्या पत्रान्वये उपजिल्हा रुग्णालय निफाड, ता.निफाड जि.नाशिक येथील १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयास श्रेणीवर्धन करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव सादर केला असून त्यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

निफाड, ता.निफाड, जि. नाशिक येथील उपजिल्हा रुग्णालयाचे ५० खाटांवरुन १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर श्रेणीवर्धीत १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयासाठी त्या ठिकाणी पुरेशा प्रमाणात जागा उपलब्ध असल्याने सदर जागा विहित पध्दतीने अधिग्रहीत करुन बांधकाम व पदनिर्मिती करणे याबाबत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२४११२१४२३०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=685cbbb5899027ea29d44ae02d12f2c1313143ad8376755d0e815a1eb20fd0ce, cn=Roshani Dinesh Kadam Patil
Date: 2022.04.06 17:30:20 +05'30'

(रो.दि.कदम पाटील)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण ) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
५. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
६. संचालक-१, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७. संचालक-२, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
९. सहसंचालक, आरोग्य सेवा (प्राआकेंद्र -जिपस्तर), पुणे.
१०.उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.
११.जिल्हा शल्य चिकित्सक, नाशिक
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
१३.वित्त विभाग,(व्यय-१३) मंत्रालय,मुंबई.
१४.नियोजन विभाग,(का.१४७२) मंत्रालय,मुंबई
१५.कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प,सा.आ.वि.मंत्रालय,मुंबई.
१६. निवडनस्ती (आरोग्य-३)